**दिवंगत श्री. आढारी डी.के. चतुर्थीश्रेणी कर्मचारी यांच्या घरबांधणी अग्रीमावरील व्याज क्षमापित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग,**
**शासन ज्ञापन क्रमांक : अव्यामा-२०२१/प्र.क्र.१३३/व्यशि- ४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ८ डिसेंबर, २०२१.

**संदर्भ:-** १. संचालक व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांचे क्र.१५/वि.व्य (१) /२०२१/घबांअ/व्याजमाफी/३३६ दि.१५.११.२०२१ चे पत्र
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. घबांअ-२०१२/ प्र.क्र.३०/ २०१२/ विनियम दि.२०.०२.२०१५

**शासन ज्ञापन :-**

उपरोक्त संदर्भाधीन पत्राच्या अनुषंगाने आपणास असे कळविण्यात येते की, प्रादेशिक कार्यालय पुणे यांचे अधिपत्याखाली औद्योगिक प्रशिक्षण संस्था, घोडेगांव पुणे येथे कार्यरत असणाऱ्या दिवंगत आढारी डी.के.चतुर्थीश्रेणी कर्मचारी यांचे दि.३१.१०.२०१७ रोजी निधन झाले आहे. त्यांना प्रादेशिक कार्यालय पुणे यांच्या कार्यालयीन आदेश दि.२०.०२.२००७ अन्वये वित्तीय नियमावली १९५९ मधील भाग पहिला उपविभाग-१ मधील नियम क्र-१३४ (३) नुसार आर्थिक वर्ष सन २००६-०७ मध्ये रु.२,४७,४८८/- (रु.दोन लक्ष सत्तेचाळीस हजार चारशे अठ्ठयांऐशी) घरबांधणी अग्रीम प्रदान करण्यात आलेला आहे. सदर रकमेची वसुली करुन, मूळ अग्रिम रकमेवरील व्याजाची रक्कम रु.१,६८,४९८/- (रु.एक लक्ष अडुसष्ठ हजार चारशे अठ्ठयान्नव फक्त) वसूली होण्यापूर्वीच श्री.आढारी चतुर्थश्रेणी कर्मचारी यांचा दि.३१. १०.२०१७ रोजी निधन झाले . त्यामुळे त्यांच्याकडून उर्वरीत घरबांधणी अग्रीमावरील व्याज रु. रु.१,६८,४९८/- (रु.एक लक्ष अडुसष्ठ हजार चारशे अठ्ठयान्नव फक्त ) वसूल करता आलेले नाहीत. सदर रक्कम क्षमापित करण्याचा प्रस्ताव संदर्भ क्र.१ नुसार शासनास सादर करण्यात आला आहे. त्यानुसार सदर घरबांधणी अग्रिमावरील व्याजाची रक्कम क्षमापित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२. “वित्त विभाग, शासन निर्णय क्र. घबांअ-२०१२/प्र.क्र.३०/२०१२/विनियम दि.२०.०२.२०१५ मधील परिच्छेद १० मधील तरतुदीनुसार दिवंगत आढारी चतुर्थश्रेणी कर्मचारी हे दिवंगत झाले असल्याने त्यांच्या घर बांधणी अग्रीमावरील रु.१,६८,४९८/- (रु.एक लक्ष अडुसष्ठ हजार चारशे अठ्ठयान्नव फक्त ) इतके व्याज माफ करण्यास या शासन ज्ञापनान्वये मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर ज्ञापन मा.प्रधान सचिव कौशल्य विकास रोजगार व उद्योजकता विभाग, यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२११२०८१७१७५६२३०३ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRABHAKAR A SANKHE

Digitally signed by PRABHAKAR A SANKHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT ENTREPRENEURSHIP AND EMPLOYMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1bac9385344f87e77e1084162b6716914d02e353160fac64808fec76c25d6d90, pseudonym=11AF006A9B8244D291C83FCA56E433781EE9E76C, serialNumber=2F853CAC13002D53D7034663C6F0D48D3ADE65B7222B4D38B6E5902DB13A4750, cn=PRABHAKAR A SANKHE
Date: 2021.12.08 17:23:00 +05'30'

**( प्रभाकर संखे )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण , व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, संचालनालय महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, पुणे
३. प्र.प्राचार्य,शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, घोडेगांव जि.पुणे,.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे
५. महालेखापाल ( लेखा वअनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र,/मुंबई/नागपूर
६. महालेखापाल ( लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
७. निवडनस्ती (व्यशि-४)